सहायक कामगार आयुक्त (गट-अ ) या
पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
## शासन आदेश क्रमांकः पदोन्न-२०२२/प्र.क्र.२२९/कामगार-८

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १४ मार्च, २०२३

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग ,शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या.-१२, दि.०१.०८.२०१९

२) सामान्य प्रशासन विभाग अनौ.स.क्र.१२४८/२०२२/१२, दि.७.१२.२०२२

**शासन आदेश:**

कामगार आयुक्त यांच्या आस्थापनेवरील सरकारी कामगार अधिकारी, गट-ब या संवर्गातील खालील नमूद अधिका-यांना सहायक कामगार आयुक्त, गट-अ या संवर्गात या शासन आदेशान्वये निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. त्यांना पदोन्नतीनंतर खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नाव ,पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना / कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | ०२ | श्री. प्र. रा. महाले, सरकारी कामगार अधिकारी | इ.मा.व. (वैध ) | सहायक कामगार आयुक्त पालघर या रिक्त पदावर |
| २ | ०३ | श्री. मं. रा. झोले, सरकारी कामगार अधिकारी | भ.ज.क (वैध) | सहायक कामगार आयुक्त लातूर या रिक्त पदावर |

२. मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून सदर संवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाजेष्ठतेनुसार आणि सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सदर तात्पुरत्या पदोन्नतीस मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त तक्त्यात नमूद पदोन्नत अधिका-यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी याद्वारे तात्काळ कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबतचा रुजू अहवाल संबंधित पदोन्नत अधिका-यांनी कामगार आयुक्त यांच्यामार्फत शासनास सादर करावा. पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार संबंधितावर कार्यवाही करण्यात येईल. तसेच त्यांनी अनधिकृतपणे रजेवर जाऊ नये. तसेच पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली,२०२१ मधील २ (ड) मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्ती होणा-या सदर अधिका-यांनी सदर आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजु होणे आवश्यक आहे. सदर मुदतीत रुजु न झाल्यास संबंधित अधिका-याचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dias non) म्हणुन गणला जाईल, याची देखील संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१४१७०२०३३६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2023.03.14 17:06:53 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
३. कामगार आयुक्त, कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
४. कामगार उप आयुक्त (प्रशासन), कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई
५. महालेखापाल कार्यालय (ले. व अ.)/(ले.प.), मुंबई-१
६. अपर कामगार आयुक्त, कोकण
७. कामगार उप आयुक्त, पालघर
८. कामगार उप आयुक्त, औरंगाबाद
९. जिल्हा कोषागार अधिकारी,पालघर
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
११.संबंधित पदोन्नत अधिकारी (कामगार आयुक्त यांचेमार्फत)
१०. निवड नस्ती (कामगार-८).